महाराष्ट्र शासन

**क्र.बीसीएच-२०२४/प्र.क्र.३८/शिक्षण-२**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
मंत्रालय विस्तार,मुंबई-४०० ०३२
दिनांक : २६ मार्च, २०२४

**विषय :-** भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर स्वाधार योजना, लेखाशिर्ष २२२५, ई७७७ या योजनेखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता फेब्रुवारी, २०२४ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजूर तरतूद वितरीत करण्याबाबत....

**वाचा** : वित्त विभाग, शासन परिपत्रक,क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०४ मार्च, २०२४

**ज्ञापन :-**

डॉ.बाबासाहेब आंबेडकर स्वाधार योजना लेखाशिर्ष २२२५ ई७७, ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी रू.१५०००.०० लक्ष तसेच जुलै, २०२३ च्या पावसाळी अधिवेशनात रु.५०००.०० लाख, डिसेंबर, २०२३ च्या अधिवेशनात रु.५०००.०० लाख व फेब्रुवारी, २०२४ च्या अधिवेशनात रु.५०००.०० लाख इतकी रक्कम पुरवणी मागणीद्वारे मंजूर असून एकुण रु.३००००.०० लाख (अक्षरी रूपये तीनशे कोटी) इतकी तरतूद अर्थसंकल्पीत आहे. त्यापैकी यापूर्वी रु.२५०००.०० लक्ष (अक्षरी रुपये दोनशे पन्नास कोटी फक्त) इतकी तरतूद वितरीत करण्यात आली आहे. तसेच सन २०२३-२४ च्या फेब्रुवारी, २०२४ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात या योजनेसाठी रु.५०.०० कोटी इतक्या रक्कमेची पुरवणी मागणी मंजूर करण्यात आली आहे. त्यानुसार वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन डॉ.बाबासाहेब आंबेडकर स्वाधार योजनेसाठी फेब्रुवारी, २०२४ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजूर रु.५०००.०० लाख (अक्षरी रुपये पन्नास कोटी फक्त) इतका निधी वितरीत करण्यास व खर्च करण्यास या ज्ञापनाव्दारे मान्यता देण्यात येत आहे:-

( रूपये लाखात )

| अ. क्र. | लेखाशिर्ष व उद्दिष्ट | सन २०२३-२४ अर्थसंकल्पीत तरतूद पुरवणी मागणीसह | फेब्रुवारी, २०२४ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात मंजूर पुरवणी मागणी | यापूर्वी वितरीत तरतूद | मंजूर पुरवणी मागणीची वितरीत करावयाची तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| १ | २२२५ई७७७, ३१ सहायक अनुदाने वेतनेतर | ३००००.०० | ५०००.०० | रु.२५०००.०० | ५०००.०० |

२. सबंधित नियंत्रक अधिकारी यांनी उपरोक्त विवरणातील रकाना क्रमांक ६ मध्ये वितरीत करण्यात आलेल्या तरतूदीच्या मर्यादेत खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे खर्चाचे विवरण (जिल्हानिहाय खर्च /लाभार्थी संख्या) व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करावे. सदरील निधी पूर्ण खर्च झाल्याबाबत नियंत्रक अधिकाऱ्याच्या प्रमाणपत्रासह पुढील निधी मागणीबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

३. उपरोक्त योजनेअंतर्गत चालू आर्थिक वर्षातील खर्चाचे तसेच मागील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे नियंत्रक अधिकारी यांनी तपासण्याच्या अधीन राहून निधी खर्च करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकाऱ्यांची राहील. तसेच, वित्तीय नियमावली,महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका यानुसार वेळोवेळी वित्त विभागाने निर्गमित केलेल्या अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करून कोणतीही वित्तीय अनियममितता होणार नाही,याची दक्षता घेण्याची जबाबदारी आयुक्त,समाज कल्याण आयुक्तालय, पुणे यांची राहिल.

४. सदर ज्ञापन हे वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०४ मार्च, २०२४ अन्वये विभागास प्राप्त अधिकारानुसार तसेच वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.३२४/२०२४/व्यय-१४, दि.२१.०३.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक संकेतांक २०२४०३२६१५५००३९४२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL KONDAJI AHIRE

Digitally signed by ANIL KONDAJI AHIRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD9B93035F4DA174C04FA71634FE1F6AA493C78A5335F985651F937888DF7A89, cn=ANIL KONDAJI AHIRE
Date: 2024.03.26 15:59:27 +05'30'

**( अ.कों.आहिरे )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

आयुक्त,समाज कल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे
महालेखापाल,१ व २ ( लेखा व अनुज्ञेयता ),महाराष्ट्र,मुंबई / नागपूर
महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
वित्त विभाग (अर्थ-३), मंत्रालय, मुंबई
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण सर्व
सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण सर्व
जिल्हा समाज कल्याण अधिकारी सर्व
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
अवर सचिव (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
निवडनस्ती (शिक्षण-२)